पुणे शहर महानगरपालिका

श्री.अंबरिष रतिकांत गालिंदे यांची मुख्य लेखापरिक्षक
या पदावरील नियुक्ती नियमित/कायम करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र.पीएमसी ३००७/८१४/प्र.क्र. १९४ /२००७ /नवि-२२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ११ फेब्रुवारी,२०११

वाचा :-१) सहआयुक्त, पुणे शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.सहमआ/से/११३९, दि.१२.९.२००६

२) सहआयुक्त, पुणे शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.सहमआ/से/१६५८, दि.२३.११.२००६

३) सहआयुक्त, पुणे शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.सहमआ/से/१९९,दि.३.११.२००७ व त्यासोबतची सहपत्रे

४) आयुक्त, पुणे शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मआ/उआ/से/४८९,दि.२१.५.२००८ व त्यासोबतचा मनपा ठराव क्र.५०७,दि.२३.२.२००७ आणि सहपत्रे

५) उपायुक्त, पुणे शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मआ/उआ/ (जि.घ.)/ से/ १३२०, दि.३०.७.२००८

६) उपायुक्त (भूसंपादन व व्यवस्थापन) यांचे पत्र क्र.एलईओ/२४६८,दि.८.९.२००८ व त्यासोबतचे सहपत्र क्र.एलईओ ४२२३, दि.२४.४.२००८

७) उपायुक्त, पुणे शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मआ/उआ/ से/२०४७, दि.२६.१०.२००९

८) उपायुक्त, पुणे शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मआ/उआ/ से/४७, दि.५.४.२०१०

९) उपायुक्त, पुणे शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मआ/उआ/ से/११०६, दि. २३.६.२०१०

१०) उपायुक्त, पुणे शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मआ/उआ/ से/२१२२, दि. ३१.८.२०१०

प्रस्तावनाः- मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ४५ अन्वये प्राप्त अधिकारात पुणे शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील "मुख्य लेखा परिक्षक" या संवर्गातील रिक्त असलेल्या पदावर नियुक्ती करण्यासाठी महानगरपालिका प्रशासनाने , या पदांच्या विहीत शैक्षणिक अर्हता व पात्रतेनुसार सरळसेवा पध्दतीने नियुक्तीसाठी वृत्तपत्रात जाहिरात देवून, तसेच सेवायोजन कार्यालयाकडून विहित शैक्षणिक पात्रता धारण करणाऱ्या उमेदवारांच्या नावांची यादी मागवून अर्ज मागविण्यात आले होते. त्यानुसार महानगरपालिकेस प्राप्त १७ अर्जापैकी ९ अर्ज पात्र आणि ८ अर्ज अपात्र ठरले. यातील पात्र ठरलेल्या ९ उमेदवारांपैकी निवड समितीच्या मुलाखतीस ८ उमेदवार उपस्थित राहिले, यातून निवड समितीने महानगरपालिका प्रशासनाकडील मुख्य लेखापाल

या पदावर कार्यरत असलेले श्री.गालिंदे अंबरीष रतिकांत यांची "मुख्य लेखा परिक्षक" या पदावर नेमणूकीस एक मताने शिफारस केली आहे. या नेमणूकीस महासभा ठराव क्र.५०७, दि.२३.१२.२००७ अन्वये महासभेने मान्यता दिली आहे. त्यानुसार आयुक्तांनी दि.२१.४.२००७ रोजीच्या आज्ञा पत्राद्वारे श्री.गालिंदे यांची मुख्य लेखा परिक्षक या रिक्त पदावर नियुक्ती/नेमणूक केली आहे . सबब मुंबई प्रांतिक महानगरपालिका,१९४९ च्या कलम ४५ (४) अन्वये सदर नियुक्ती शासनाकडून नियमित /कायम करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त, पुणे शहर महानगरपालिका यांनी संदर्भाधिन पत्रान्वये शासनास सादर केला आहे. तसेच प्रसंगत: या प्रकरणी शासनास वेळोवेळी प्राप्त तक्रारी, निवेदने यांचे बाबतीत पुणे महानगरपालिकेकडून प्राप्त अहवाल देखील या प्रकरणी विचारात घेवून आयुक्तांनी सादर केलेल्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u> आयुक्त, पुणे शहर महानगरपालिका,पुणे यांनी संदर्भाधीन पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावातील तपशिल आणि महानगरपलिका मुख्य सभा ठराव क्र. ५०७,दिनांक २३.२.२००७ विचारात घेवून,श्री.गालिंदे अंबरीष रतिकांत यांची मुख्य लेखा परिक्षक या रिक्त पदावरील नियुक्ती, त्यांच्या स्वत:च्या मुख्य लेखाधिकारी म्हणून कार्य काळातील लेख्यांचे लेखा परिक्षण ते करणार नाहीत, या अटीच्या अधिन राहून मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ मधील कलम ४५(४) अन्वये प्राप्त अधिकारात नियमित/कायम करण्यास या आदेशाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२. आयुक्त, पुणे शहर महानगरपालिका,पुणे यांनी या आदेशाच्या अनुषंगाने सर्व संविधानिक बाबीची पूर्तता करुन शासनास अहवाल पाठवावा.

०३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. 20110211210612001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ सुनील कोठेकर ]
कार्यासन अधिकारी महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
२) मा.राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
३) प्रधान सचिव ( नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
४) आयुक्त, पुणे शहर महानगरपालिका,पुणे
५) मुख्य लेखा परिक्षक , पुणे शहर महानगरपालिका,पुणे
६) उपायुक्त (सेवक वर्ग) , पुणे शहर महानगरपालिका,पुणे
७) नगर सचिव , पुणे शहर महानगरपालिका,पुणे
८) कक्ष अधिकारी, (संगणक शाखा), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
९) निवडनस्ती (नवि-२२)

E:\UD 22 G.R..lwp